पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित
अंतिम सुधारीत अनुदान सन २०१६-२०१७
मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने
(०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज
(२०४९ १२६८) भारित ४५, व्याज

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१७/प्र.क्र.७७/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१७

**वाचा :-**

**समक्रमांक शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि. दि.१० मार्च, २०१७**

**प्रस्तावना :-**

सन १९८२-८३ पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे कार्यरत असलेल्या सर्व कर्मचारी / अधिकारी यांचेकडून भविष्य निर्वाह निधी पोटी प्राप्त होणारी वर्गणीची रक्कम / सांविधिक ठेव म्हणून लेखाशिर्ष-८३३६ नागरी ठेवी अंतर्गत शासनाकडे जमा करण्यात येते. शासनाकडे मार्च अखेर एकूण जमा असलेल्या रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या व्याज दराने प्रचलित पद्धतीने लेखाशिर्ष २०४९ १२६८ अंतर्गत व्याज देण्यात येते. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी सदर प्रयोजनार्थ रु.१६,७०,९१,०००/- ( अक्षरी रुपये सोळा कोटी सत्तर लाख एक्याण्णव हजार फक्त ) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. सदर निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास पुस्तकी समायोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाचा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचारी यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (२०४९ १२६८) भारित ४५, व्याज या लेखाशिर्षाखाली आर्थिक वर्ष सन २०१६-१७ करीता रु.१६,७०,९१,०००/- (अक्षरी रुपये सोळा कोटी सत्तर लाख एक्याण्णव हजार फक्त)

इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. सदर रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वाचा मधील शासन निर्णयान्वये पुस्तकी समायोजनाद्वारे मुक्त करण्यात आली आहे. सदर मुक्त करण्यात आलेली रक्कम अंतिम सुधारीत अनुदान म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर खर्च हा पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजीत करावयाचा असून हा खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज प्रदान करण्यासाठी मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचा-यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (२०४९ १२६८) भारित ४५, व्याज या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानूत होणारा खर्च हा "८३३६-नागरी ठेवी, ८००-इतर ठेवी, (००) (०८) महाराष्ट्र पाणी पुरवठा व मलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६ ५०६७) " या शिर्षाखाली जमा करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११३५१२०६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.04.01 14:29:56 +05'30'

**सतीश वि. कोवे**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. अ.मु.स./प्र.स./सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग,मुंबई.
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)

६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
११. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३, अर्थ-१९, कोषा-५)
१२. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४११)
१३. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१४. निवड नस्ती कार्यासन पापु-२३